भाजीपाला, रोपमळे, फळे रोपमळे, स्थानिक उद्याने या योजनेतील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- फरोवा-२०१८/प्र.क्र.१५८/१३अे**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०५ नोव्हेंबर, २०१८

संदर्भ :- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/ वित्तीय सुधारणा- १ दि.४/१०/२००४.
२) शासन निर्णय,कृषी व पदुम विभाग,क्र.फरोवा-२०१७/५९/प्र.क्र.३२/१३-अे, दि. १७/०३/२०१८
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०७/०९/२०१८.
४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ-१११/साप्र/१७२२/१८-१९/प्र.क्र.४/आस्था-५ (निप)/ ५१७, दि.२१/०९/२०१८.

## शासन निर्णय-

भाजीपाला, रोपमळे,फळे रोपमळे, स्थानिक उद्याने योजनेतील एकूण ९२६ अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये दि.०१/०३/२०१८ ते ३०/९/२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये विनंती केल्यानुसार खालील ९२६ अस्थायी पदांना दि.०१/१०/२०१८ ते २८/०२/ २०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | पदनाम | सध्या मंजूर अस्थायी पदे |
|---|---|---|
| | **गट-ब** | |
| १ | महाराष्ट्र कृषि सेवा | १ |
| २ | कृषि अधिकारी | ८ |
| | **गट-क** | |
| ३ | कृषि पर्यवेक्षक | ११४ |
| ४ | कृषि सहाय्यक | ८६ |
| ५ | लिपिक | १२३ |
| ६ | प्रयोगशाळा सहाय्यक | ३ |
| ७ | यंत्रचालक | १ |
| | **गट-ड** | |
| ८ | रोपमळा मदतनीस | ४०९ |
| ९ | शिपाई | १२३ |
| १० | मजूर | ४२ |
| ११ | ट्रिलर ऑपरेटर | १५ |
| १२ | स्वच्छक | १ |
| एकूण | | **९२६** |

२. या वरील होणारा खर्च खालील लेखाशिर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामधील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा :-

मागणी क्र.डी-३
२४०१ पीक संवर्धन
११९ बागायती व भाजीपाला पिके
११९ (०३) रोपमळे
(०३)(०१) भाजीपाला रोपमळे, फळ रोपमळे व स्थानिक उद्याने
(२४०१ १७२२)

३. हे आदेश वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/भाग-२ /२००४/ वित्तीय सुधारणा-१, दि.४ ऑक्टोबर, २००४ अन्वये, तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दि.०७/०९/२०१८ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार एकूण ९२६ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास दि. ०१/१०/२०१८ ते दि.२८/०२/२०१९ पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८११०५१८४३१७८३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2018.11.05 18:46:55 +05'30'

**( अशोक आत्राम )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२) संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
३) सर्व संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
४) सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
५) सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
६) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर,
७) महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
८) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०) सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई -३२,
११) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.
१२) कक्ष अधिकारी (पदुम-१६), कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.
१३) निवड नस्ती (१३-अे).